**मौजे कळंभीर, ता. साक्री जि. धुळे येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे फोफरे ता. साक्री जि. धुळे येथे स्थलांतरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२४/प्र.क्र.४९/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०५ मार्च, २०२४.

**वाचा :**

**आरोग्य सेवा आयुक्तालय यांचे पत्र क्रमांक : आआसे / कक्ष-७अ / टे-९/ प्राआकेंद्र कळंभीर/ स्थलांतर/ फोफरे/धुळे/६५२६-२८/२०२३, दि. १३/०९/२०२३.**

**प्रस्तावना :**

मौजे कळंभीर, ता. साक्री जि. धुळे येथील प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी जागा उपलब्ध नसल्याने व कळंभीर या गावाची लोकसंख्या कमी असल्याने तेथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे फोफरे ता. साक्री जि. धुळे येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

मौजे कळंभीर, ता. साक्री जि. धुळे येथील प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी जागा उपलब्ध नसल्याने व कळंभीर या गावाची लोकसंख्या कमी असल्याने तेथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे फोफरे ता. साक्री जि. धुळे येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे:

अटी व शर्ती :-

१) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यान्वित होवू शकेल याकरीता संबंधित ग्रामपंचायतीने मोफत जागा उपलब्ध करुन देणे आनिवार्य असेल.

२) सदर प्राथमिक आरोग्य केंद्राच्या बांधकामासाठी जिल्हा नियोजन व विकास मंडळाने त्यांच्या जिल्हा योजनेतून तरतूद उपलब्ध करुन घेणे आवश्यक आहे.

३) स्थलांतरीत ठिकाणी विहित पद्धतीने जागा अधिग्रहीत करुन जिल्हा परिषदेकडुन प्राथमिक आरोग्य केंद्राचे बांधकाम पुर्ण झाल्यानंतर सदर ठिकाणी स्थंलातर करण्यात यावे. तोपर्यंत सदर प्राथमिक आरोग्य केंद्र सध्या कार्यान्वित असलेल्या ठिकाणी सुरु ठेवण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१५५८५२९११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.03.05 18:01:00 +05'30'

**(कविता प्र. पिसे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, धुळे.

४. सह संचालक, आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्र जि.प.स्तर), मुंबई.

५. उप संचालक, आरोग्य सेवा नाशिक मंडळ, नाशिक.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे.

७. जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद, धुळे.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे.

९. निवडनस्ती (आरोग्य-३).